**राज्य प्रशिक्षण धोरणानुसार घोषित करण्यात आलेल्या जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थामध्ये फेरबदल करून नव्याने जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित करणे व ३ जिल्हा संस्थांचा प्रशासकीय प्रशिक्षण दर्जा काढण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक टिआरएन-२०१५ प्रक्र.८०/१५/१२-अ**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ४ जुलै, २०१७**

**वाचा**

१. शासन निर्णय क्रमांक - टिआरएन- ०९/प्रक्र.३९/०९/१२-अ दि.२३ सप्टेबर, २०११
२. शासन निर्णय क्रमांक - टिआरएन- २०१४/प्रक्र.१२/१४ /१२-अ दि.१३ ऑगस्ट,२०१४
३. शासन निर्णय क्रमांक - टिआरएन- २०१४/प्रक्र.१२/१४ /१२-अ दि.१२ सप्टेबर,२०१४
४. जलसंपदा विभाग, यांची दि. १७.४.२०१५ ची टिप्पणी.
५. प्राचार्य, तथा पोलीस उप आयुक्त ( शहरे ) वाहतूक प्रशिक्षण संस्था भायखळा, मुंबई यांचे क्र.वाप्रस/पाउवा/प्राचार्य/३११/१५ दि.२४.११.२०१५ चे पत्र
६. उपमहासंचालक, यशदा पुणे यांचे क्रमाक एसटीपीए २०१७-१८/DATI-औरंगाबाद प्रक्र.१२/दि.३.६.२०१७.

**प्रस्तावना:-**

राज्य शासन सेवेत सर्व स्तरावर कार्यक्षमता वाढवून गतिमान प्रशासन होण्याकरिता राज्यातील संवर्ग अधिकारी / कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याच्या हेतूने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार तांत्रिक व प्रशासनिक सेवा या २ प्रकारच्या प्रशिक्षणांपैकी प्रशासनिक सेवांतर्गत प्रशिक्षणाची प्रक्रिया राज्य, विभाग व जिल्हा अशा ३ स्तरावर कार्यान्वित केली जाणार आहे. त्यापैकी तिस-या म्हणजे जिल्हा मुख्यालयाच्या स्तरावर प्रशिक्षण विषयक कामकाज पार पाडण्यासाठी संदर्भाधीन क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये शासनाच्या इतर विभागाच्या अधिनस्त असलेल्या तांत्रिक प्रशिक्षण संस्थांना जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आले आहे.

संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आलेल्या संस्थांपैकी, **अ.** महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, ( मेटा ) नाशिक, **ब.** महाराष्ट्र जल व भूमी व्यवस्थापन संस्था, ( वाल्मी ) औरंगाबाद, जलसंपदा विभाग आणि **क.** वाहतूक प्रशिक्षण संस्था, भायखळा, बृहनमुंबई, गृह विभाग या ३ संस्थांनी त्यांचा जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून देण्यात आलेला दर्जा रद्द करण्याची विनंती संदर्भाधीन क्र. ४ व ५ नुसार शासनास करण्यात आली होती. तथापि, काही तात्रिंक कारणास्तव सदर प्रशिक्षण संस्थांचा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून दर्जा रद्द न करता या प्रशिक्षण संस्थांचे प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उ) पैठण जि. औरंगाबाद, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक या विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थानी घेतले आहे.

आता, या ३ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थाकडून प्रशासकीय प्रशिक्षण कार्यक्रम घेण्याची अशक्यता शासनाच्या निर्दशनास आल्यामुळे सदर संस्थांना जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून देण्यात आलेला दर्जा रद्द करणे आणि महाराष्ट्र जल व भूमी व्यवस्थापन संस्था, ( वाल्मी ) औरंगाबाद, या संस्थेऐवजी संदर्भाधीन क्र.६ नुसार यशदाने नानिर्देशित केलेली मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य प्रशिक्षण धोरणाअन्वये प्रशासकीय प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरिता घोषित केलेल्या खालील ३ संस्थाचा "जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था " म्हणून दर्जा रद्द करण्यात येत आहे.

१. महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, ( मेटा ) नाशिक,

२. महाराष्ट्र जल व भूमी व्यवस्थापन संस्था, ( वाल्मी ) औरंगाबाद,

३. वाहतूक प्रशिक्षण संस्था, हंसराज लाईन, भायखळा, बृहनमुंबई,

२. त्याचप्रमाणे, राज्य शासन घोरणातील ३.२ (क) व ३.३ मधील तरतूदीनुसार जिल्हा मुख्यालयाच्या स्तरावर महाराष्ट्र जल व भूमी व्यवस्थापन संस्था, ( वाल्मी ) औरंगाबाद या संस्थेऐवजी महसूल व वन विभागाच्या अधिनस्त असलेली **" मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, ओरंगाबाद "** या संस्थेस जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रशिक्षण संस्था संबंधित जिल्हाधिकारी यांच्या नियंत्रणाखाली काम करेल. या संस्थेने नोंदणी केली नसल्यास, त्यांनी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील ३.४ मधील तरतूदीनुसार नोंदणी अधिनियम १८६० किंवा मुंबई पब्लिक ट्रस्ट ॲक्ट १९५० अंतर्गत नोंदणी करावी.

४. **सदर संस्थेचे उद्दीष्ट्ये खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आली आहेत.**

४.१ जिल्ह्यात असलेल्या वर्ग - ड च्या कर्मचाऱ्यांसाठी जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण केंद्र सुरू करून ( भविष्यात वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांसाठी )प्रशिक्षण कार्यक्रम घेणे.

४.२ विशेष योजना व कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी निवडलेल्या गटांकरिता जिल्हावार विशेष कार्यशाळा आयोजित करणे.

४.३ संबंधित जिल्ह्यातील स्थानिक स्वराज्य संस्था व शासनाचे अंगीकृत व्यवसाय यांच्या प्रशिक्षण गरजा पूर्ण करण्यासाठी क्षेत्रीय संस्थांना प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करून देणे.

४.४ प्रशिक्षणाचे वेळोवेळी मूल्यमापन करणे.

४.५ प्रशिक्षण धोरणाच्या अंमलबजावणीसंदर्भात आवश्यक कार्यवाही करणे.

५. सदर संस्थेचे प्रशिक्षणविषयक कामकाजासंदर्भात व संस्थेस मार्गदर्शन करण्यासाठी नियामक मंडळ आणि दैनंदिन कामकाजावरील नियंत्रणासाठी कार्यकारी समिती राहील. समितीची रचना पुढीलप्रमाणे आहे.

| **नियामक मंडळ** | | |
|---|---|---|
| १. | संबंधित विभागीय आयुक्त | पदसिध्द अध्यक्ष |
| २ | संबंधिम जिल्हयाचे जिल्हाधिकारी | पदसिध्द उपाध्यक्ष |
| ३ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, समान्य प्रशासन विभाग यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | शिक्षण उपसंचालक किंवा सचिव, शालेय शिक्षण विभागा | सदस्य |
| ५ | मुख्य अभियंता ( जलसंपदा ), संबंधित महसूल विभाग यांचे प्रतिनिधी किंवा अधिक्षक अभियंता | सदस्य |
| ६ | अध्यक्षांनी जिल्हयातील प्रशिक्षण संस्थांच्या प्रशिक्षकांमधून किंवा अशासकीय सदस्यांमधून संस्थेच्या ( NGO ) सदस्यांमधून नेमावयाची एक व्यक्ती दोन वर्षांनी चक्राकार पध्दतीने | सदस्य |
| ७ | महासंचालक, यशदा पुणे यांचे प्रतिनिधी | कायमस्वरुपी सदस्य |
| ८ | संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी | कायमस्वरुपी सदस्य |
| ९ | संबंधित संस्थेचे प्राचार्य /विशेष कार्य अधिकारी | सदस्य सचिव |

| **कार्यकारी समिती** | | |
|---|---|---|
| १. | संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी | पदसिध्द अध्यक्ष |
| २ | यशदाचे पालक अधिकारी | पदसिध्द उपाध्यक्ष |
| ३ | उपसचिव / अवर सचिव (प्रशिक्षण), समान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ४ | जिल्हयातील एक मुख्याधिकारी, नगर पालिका/ नगर परिषद | सदस्य |
| ५ | जिल्हयातील एक गट विकास अधिकारी / उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य), जिल्हा परिषद | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता, (बांधकाम विभाग) | सदस्य |
| ७ | जिल्हा शिक्षणाधिकारी | सदस्य |
| ८ | अध्यक्षांनी संस्थेच्य प्रशिक्षकांमधून नेमावयाची एक व्यक्ती | सदस्य |
| ९ | संबंधित संस्थेचे प्राचार्य /विशेष कार्य अधिकारी | सदस्य सचिव |

६. नियामक मंडळाची वर्षातून किमान एक बैठक व्हावी. त्यावेळी संस्थेच्या धोरणविषयक बाबींवर निर्णय घेण्यात येतील. नियामक मंडळाचा कोरम ७ सदस्यांचा असेल. कार्यकारी समितीची बैठक आवश्यकतेनुसार तथापि, वर्षातून किमान २ वेळा होणे आवश्यक आहे. कार्यकारी समितीचा कोरम ६ सदस्यांचा असेल. त्यावेळी संस्थेच्या प्रशासनिक व वित्तीय बाबी, प्रशिक्षणाची व्यवस्था याबाबत निर्णय घेण्यात येतील. तसेच, संस्थेच्या कामकाजाचा आढावा घेण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०४१५४५५२२७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijaykumar Parshuram Soshte

Digitally signed by Vijaykumar Parshuram Soshte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=106ede43bb7dcc67e6404aaa146fb4c17a872b3754b63c343b66d6b91dd6b276, cn=Vijaykumar Parshuram Soshte
Date: 2017.07.04 15:49:54 +05'30'

**( वि. प. सोष्टे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार, हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, विधान भवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा /विधानपरिषद महाराष्ट्र, विधानभवन, मुंबई
७. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
८. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
९. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
११. सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, मंत्रालयीन विभा्ग

१२. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नाशिक व औरंगाबाद.
१४. महासंचालक, यशदा बाणेर रोड, पुणे-४११००७
१५. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१ मुंबई
१६. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, नागपूर
१७. महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१ मुंबई
१८. महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१ नागपूर
१९. जिल्हाधिकारी, बृहन्मुंबई, नाशिक, औरंगाबाद
२०. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा बाणेर रोड, पुणे-४११००७
२१. उपसचिव, जलसंपदा विभाग व गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२२. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई , औरंगाबाद, नागपूर,*
२३. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा,मुंबई , औरंगाबाद, नागपूर,*
२४. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उपलोकआयुक्त कार्यालय, मुबंई *
२५. संचालक, मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, शासकीय दूध डेअरीच्या मागे, जालना रोड, औरंगाबाद ४३१००५
२६. संचालक, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
२७. विशेष कार्य अधिकारी, वाहतूक प्रशिक्षण संस्था, हंसराज लाईन, भायखळा, बृहन मुंबई
२८. विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र अभियांत्रीकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
२९. विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र जल व भूमि व्यवस्थापन संस्था (वाल्मी),आरंगाबाद
३०. विशेष कार्य अधिकारी, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जिल्हा- आरंगाबाद
३१. अपर मुख्य सचिव ( सेवा ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -३२
३२. निवड नस्ती- १२-अ साप्रवि, मंत्रालय, मुबंई-३२

***पत्राने**